महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील महिला पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या गणवेशात बदल करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,

गृह विभाग

शासन निर्णय क्र. पुएनएक १०९६/२८१४/१७/पोल-४,

मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : ११ सप्टेंबर १९९८

वाचा : १] शासन निर्णय, गृह विभाग क्र. पुएनएक ०४७४/२/पोल-४, दि. ३१. ८. ८२

२] पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/१८/५६९२/महिला पोलीस, दि. १७. ७. ९८ व दि. ३०. ७. ९८

<u>निर्णय</u> :- महिला पोलीस अधिकारी/कर्मचारी-यांकरीता. त्यांच्या कार्यकारी/कार्यक्षेत्र कर्तव्यासाठी आणि कायदा व सुव्यवस्था राखण्याकामी साडी व ब्लाऊज हा गणवेश कामाच्या स्वरूपानुसार सोयीस्कर नाही. [illegible] आरोपीचा पाठलाग करताना तसेच पोलीस व्हॅनमध्ये चढण्या/उतरण्याच्या वेळी साडीमुळे अडथळे येतात. या पार्श्वभूमीवर पुनर्विलोकन समितीने केलेल्या शिफारशीनुसार महिला पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या गणवेशात खाली दर्शविल्याप्रमाणे बदल करण्यास कोणताही अतिरिक्त खर्च येणार नाही या अटीच्या अधिन राहून शासन मंजूरी देत आहे. सदर गणवेश यापुर्वी देण्यात आलेले गणवेश जसजसे निकामी होतील तसतसे देण्यात यावेत.

<u>समारंभीय गणवेश</u>

१] खाकी टेरीकॉट बुशशर्ट
२] खाकी टेरीकॉट ट्राऊजर्स
३] सॅम ब्राऊन क्रॉस बेल्ट
४] खाकी लॅनयार्ड आणि शिट्टी
५] पीक कॅप
६] चामडी बुट

<u>कार्यकारी गणवेश</u>

१] खाकी टेरीकॉट बुशशर्ट
२] खाकी टेरीकॉट ट्राऊजर्स
३] बंदूक वापरताना कापडी अथवा चामडी पट्टा
४] खाकी लॅनयार्ड आणि शिट्टी
५] पीक कॅप
६] चामडी बूट

<u>गरोदर असतानाचा बदली गणवेश</u>

महिला अधिकारी/कर्मचारी १६ आठवड्यानंतर गरोदर असताना परिधान करावयाचा कार्यकारी गणवेश.

१] खाकी टेरीकॉट साडी
२] खाकी कॉटन पेटीकोट
३] खाकी टेरीकॉट ब्लाऊज

तथापी विशेष बाब म्हणून डॉक्टरचे प्रमाणपत्र सादर केल्यानंतर किंवा गरोदरपणात महिला पोलीस कर्मचा-यांना साडी परिधान करण्यास मंजूरी देण्याचे अधिकार पर्यवेक्षी अधिका-यांना प्रदान करण्यात येत आहेत.

२. शासन निर्णय, गृह विभाग क्र. पुएनएक ०४७४/२/पोल-७, दि. ३१.८.८२ अन्वये महिला पोलीस कर्मचा-यांना दोन नमुन्याचे ४ गणवेश देण्यात येत होते. त्याऐवजी त्यांना ३ नमुन्याचे ३ गणवेश व १ राखीव याप्रमाणे ४ गणवेश पुरविण्यात यावेत.

३. उपरोक्त गणवेशातील बदलामुळे होणारा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने/व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ८२१/९८/व्यय-७, दि. २.९.९८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

[ व. बा. चव्हाण ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व पोलीस आयुक्त
सर्व पोलीस अधिक्षक [रेल्वेसह]
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ [अधिदान व लेखा परिक्षा], मुंबई/नागपूर
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग, व्यय-७
निवड नस्ती